राज्यातील मान्यताप्राप्त अनुदानित प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांना वेतनेतर अनुदान वितरीत करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.
**आर्थिक वर्ष २०२३-२४**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः-वेतने-२०२३/प्र.क्र.१३३/एसएम-४,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांकः-१५ मार्च, २०२४

**वाचा :-** (१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. माशाअ-२०१२/(८६/१२)/माशि-१, दिनांक १९ जानेवारी, २०१३
(२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. एसएसएन-२०१५/प्र.क्र.१२/ टीएनटी-२, दिनांक ११ डिसेंबर, २०२०
(३) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३
(४) समक्रमांकाचा शासन निर्णय, दिनांक १६ नोव्हेंबर, २०२३

**प्रस्तावना:-**

संदर्भ क्र.(१) येथील शासन निर्णय, दिनांक १९ जानेवारी, २०१३ अन्वये, दिनांक १ एप्रिल, २००८ रोजी वेतन अनुदानावर असलेल्या शालेय शिक्षण विभागाअंतर्गत राज्यातील खाजगी प्राथमिक/ माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांमधील शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांना सन २००८ या वर्षी पाचव्या वेतन आयोगानुसार ज्या टप्प्यावर वेतन अनुदान अनुज्ञेय होते, त्या टप्प्यावरील देय वेतन अनुदानास गोठवून त्यांच्या पाच टक्के प्रमाणे वेतनेत्तर अनुदान (४ टक्के वेतनेत्तर अनुदान व १ टक्का इमारत भाडे/ देखभाल अनुदान) सुमारे रु.२६६.८२ कोटी च्या मर्यादेत दिनांक १ एप्रिल, २०१३ पासून उपलब्ध करण्यास मान्यता देण्यात आली आहे.

संदर्भ क्र. (२) येथील शासन निर्णय, दिनांक ११ डिसेंबर, २०२० अन्वये राज्यातील मान्यताप्राप्त खाजगी अंशतः/ पूर्णतः अनुदानित माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांतील चतुर्थश्रेणी कर्मचाऱ्यांसाठी सुधारीत आकृतीबंध लागू करण्याऐवजी, चतुर्थश्रेणी कर्मचारी नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त झाल्यानंतर, त्या व्यपगत होणाऱ्या पदासाठी प्रतिशाळा शिपाईभत्ता लागू करण्यात आला आहे.

संदर्भ क्र. (३) येथील शासन परिपत्रकास अनुसरुन, यापूर्वी संदर्भ क्र. (४) येथील शासन निर्णयान्वये आर्थिक वर्ष २०२३-२४ या वर्षाकरीता राज्यातील खाजगी अनुदानित प्राथमिक/ माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांना त्यांचा वेतनेतर खर्च भागविण्यासाठी तसेच खाजगी अंशतः / पूर्णतः अनुदानित

माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांना चतुर्थश्रेणी कर्मचाऱ्यांच्या नियत वयोमानानुसार रिक्त झालेल्या पदांच्या प्रमाणात शिपाई भत्ता अदा करण्यासाठी वेतनेतर अनुदान मंजूर करण्यात आले असून आता उक्त नमूद शाळांसाठी आणखी वेतनेतर अनुदान मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय :-**

संदर्भाधीन शासन निर्णय, दिनांक १९ जानेवारी, २०१३ मधील तरतूदीनुसार राज्यातील मान्यता प्राप्त प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांना खालील अटींच्या अधीन राहून रु.५२,०८,२०,२००/-( रुपये बावन्न कोटी आठ लाख वीस हजार दोनशे फक्त ) इतका निधी वेतनेतर अनुदान म्हणून मंजूर व मुक्त करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(१) १०० टक्के वेतनेतर (Non Plan) मध्ये वेतन घेणाऱ्या शिक्षक/शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या वेतनानुसार दिनांक ०१ एप्रिल, २००८ रोजी देय असलेल्या ५ व्या वेतन आयोगानुसार वेतन अनुदान गोठवून त्यानुषंगाने ५ टक्के वेतनेतर अनुदान देय होईल.

(२) बालकांच्या मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा हक्क अधिनियम, २००९ नुसार व मा. सर्वोच्च न्यायालयाच्या निदेशानुसार दिनांक ३० मार्च, २०१३ पर्यंत भौत्तिक सुविधा व इतर बाबींची पूर्तता करणाऱ्या शाळांना गुणवत्तेनुसार,सर्वात जास्त पटसंख्या असलेल्या व प्रत्यक्ष सुरु शाळांना प्राधान्य देऊन वेतनेतर अनुदान वितरीत करावे.

(३) तसेच, संदर्भ क्र. (२) येथील शासन निर्णयानुसार खाजगी अंशत: / पूर्णत: अनुदानित माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांना चतुर्थश्रेणी कर्मचाऱ्यांच्या नियत वयोमानानुसार रिक्त झालेल्या पदांच्या प्रमाणात शिपाई भत्ता अदा करण्यासाठी वेतनेतर अनुदान वितरीत करावे.

(४) सदर वेतनेतर अनुदान आयुक्त (शिक्षण), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अधिनस्त सुपूर्द करण्यात येत असून, वेतनेतर अनुदानाचे वाटप शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशातील अटी व शर्तीच्या अधीनतेने करावे. तसेच, आयुक्त (शिक्षण), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शाळांना वाटप केलेल्या वेतनेतर अनुदानाची सविस्तर माहिती शासनास सादर करावी.

२. उपरोक्त बाबीवर होणारा खर्च “मागणी क्र. ई-२” या मुख्य लेखाशिर्षांतर्गत खालील तक्त्यात दर्शविण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली आर्थिक वर्ष २०२३-२४ करीता मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

( रुपये लाखात )

| अ.क्र. | लेखाशिर्ष | सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी मंजूर तरतूद | सन २०२३-२४ चे सुधारीत अंदाजानुसार मंजूर तरतूद | विभागाने यापूर्वी वितरीत केलेला निधी | या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली रक्कम |
|---|---|---|---|---|---|
| १. | ०३, इतर स्थानिक संस्थाना अनुदाने, (०३)(०२) इतर स्थानिक संस्थांना अनुदाने ( अनिवार्य ) (२२०२०२०८), ३१- सहायक अनुदान (वेतनेतर) | रु.२७६९.७६ | रु.१९३८.८३ | रु.६०३.९५२०० | रु.५०३.९५२० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| २. | (००)(०१) सर्वसाधारण माध्यमिक शाळांना सहायक अनुदान (अनिवार्य ) (२२०२०४४२), ३१- सहायक अनुदान (वेतनेतर) | रु.२०१५६.९६ | रु.१३५८३.६८ | रु. ३९२९.९६७६ | रु.४१३२.६५६४ |
| ४. | (००)(०४) अशासकीय कनिष्ठ महाविद्यालयांना सहायक अनुदान (अनिवार्य ) (२२०२०४७८), ३१- सहायक अनुदान (वेतनेतर) | रु.३१७५.५२ | रु.२२२२.८६ | रु.६३५.१०४० | रु.५७१.५९३६ |
| | एकूण | रु.२६१०२.२४ | रु.१७७४५.३७ | रु.५१६९.०२३६ | रु.५२०८.२०२ |

**( रुपये बावण्ण कोटी आठ लक्ष वीस हजार दोनशे फक्त )**

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १९५/व्यय-५, दिनांक २२.०२.२०२४ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अधीनतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०३१५१२१२११९९२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRAMOD VITHOBA KADAM

Digitally signed by PRAMOD VITHOBA KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=f82b9e0b005ed06987e1ae26683203c8f241022e0aad6b1c827af561b72f83bb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AF4901BED6A4BEE0ED963C63F1B0172A4718894A400C0988FBB3381DB913696F, cn=PRAMOD VITHOBA KADAM
Date: 2024.03.15 12:21:51 +05'30'

**( प्रमोद कदम )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव.
३) मा. उप मुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव.
४) मा. मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव
५) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
७) सर्व जिल्हाधिकारी,
८) आयुक्त (शिक्षण), शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे,
९) शिक्षण संचालक (प्राथमिक /माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे,
१०) विभागीय शिक्षण उपसंचालक (सर्व)

११) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१/२ महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
१२) महालेखापाल (लेखापरिक्षा)-१/२, महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
१३) शिक्षणाधिकारी (प्राथमिक / माध्यमिक ), जिल्हा परिषद (सर्व )
१४) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१५) शालेय शिक्षण व क्रीडा विभागातील सर्व कार्यासने
१६) निवड नस्ती, एसएम-४.